**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मातृवंदना योजनेकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठीचा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत. राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२१११४७७)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२१/प्र.क्र. ०१ /अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- १३ ऑक्टोबर, २०२१

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.६.४.२०२१

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थस-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.२४.६.२०२१

३) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.प्रमाव २०२१/प्र.क्र.४५७/कु.क.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मातृवंदना योजना अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२११-कुटुंबकल्याण, ००, ७८९-अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) प्रधानमंत्री मातृवंदना योजना (केपुयो) (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१११४७७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली एकूण रु.१८८४.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.६.२०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.२ अन्वये वित्त विभागाने कार्यक्रमांतर्गत योजनांच्या ६० टक्के मर्यादेत खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. त्यानुसार अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातंर्गत सार्वजनिक आरोग्य विभागाने वाचा क्र.३ येथील नस्तीवर प्रस्तावित केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मातृवंदना योजना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीपैकी राज्य हिस्सा ४०टक्के २२१११४७७ या लेखाशिर्षाखाली रु.२,३०,७४,२३६/- इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. कोव्हीड-१९ मुळे राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सार्वजनिक विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ६.४.२०२१ व दि.२४.६.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ६.४.२०२१ व दि.२४.६.२०२१ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ७७९, दि.१४.०९.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२११६२००२१३२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, pseudonym=81399435626E9FEA18299D95CAA243F02DC0029F, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2021.10.21 16:26:38 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभिया,मुंबई
४) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटूंब कल्याण कार्यालय, पुणे
६) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
८) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग